

PRATHAM BOOKS
A Book in Every Child's Hand

# आजीचा चष्मा

**Author:** Rohini Nilekani
**Illustrator:** Tanaya Vyas
**Translator:** Meera Joshi

वाचन पातळी २



आजी तिचा चष्मा सारखा हरवते. आणि मग विचारत राहते, “कुठं बरं ठेवला मी चष्मा?” चष्म्याशिवाय तिला तिचा चष्माच सापडत नाही!



म्हणून तिला सारखी मी हवी असते. मी म्हणजे जणू तिचे डोळेच. शिवाय, तिचे ‘डोळे’ शोधायलाही तिला मीच लागते!



कधीतरी तिचा चष्मा बाथरूममध्ये राहतो. कधीतरी पलंगावर असतो. तर कधी डोक्यावरच अडकवलेला असतो.

मी तिला सांगते, “अगं आजी, तो काय तुझ्या डोक्यावर आहे चष्मा.”



“अगबाई खरंच की. काय खुळी आहे मी. थँक यू, बाळा,” ती खिदळत म्हणते.
या वेळेस मात्र आजीचा चष्मा मला सापडतच नाहीये अजून.



मी तिच्या नेहमीच्या ठिकाणी पाहिला. सगळीकडं शोधला.तिच्या डोक्यावर, बाथरूममध्ये, तिच्या कपाटात आणि देव्हाऱ्यावर.

तिच्या आवडत्या खुर्चीखाली, आणि जेवायच्या टेबलावरसुद्धा शोधला.

पण छे, अगदी कुठंच सापडेना चष्मा. कुठं बरं गेला असेल?



मग मी चांगली गुप्तहेर बनायचं ठरवलं. आज दिवसभरात तिनं काय काय केलं ते शोधून काढूया म्हटलं.



आजी म्हणाली, “आज मी फारसं काहीच केलं नाही. वीणाच्या सासूबाई आल्या होत्या, त्यांच्याशी गप्पा मारल्या.
काय काय गावभरच्या गोष्टी सांगतात त्या.
त्यांच्याबरोबर खूपदा चहा झाला आणि तुझ्या आईनं केलेले सगळे लाडू त्यांनी खाल्ले.”



राजू म्हणाला, “आजी आज खूपच कामात होती. मुख्यमंत्र्यांना तिनं तिच्या निवृत्तीवेतनाबद्दल काहीतरी पत्र लिहिलं.”



आई म्हणाली, “तुझ्या मावशीशी ती बराच वेळ फोनवर बोलत होती. आज तिनं राजूचा स्वेटरपण विणून पूर्ण केला. आणि मग ती थोडा वेळ चालायला जाऊन आली.”

आता मला चष्मा शोधण्यासाठी बरेच धागेदोरे मिळाले! घरातल्या सगळ्या नव्या जागा मी शोधल्या.आणि घ्या, सापडला की चष्मा!



तिचा चष्मा होता टेबलावर, लोकरीत गुंडाळलेला, तिच्या पेनाच्या शेजारी, फोनच्या खाली. आणि बाजूला अर्धवट खाल्लेला लाडूपण होता !

आजीच्या पुढच्या वाढदिवसासाठी मी आता पैसे साठवून, तिला अजून एक चष्मा घेणार आहे!

PRATHAM BOOKS storyweaver



## Story Attribution:

This story: आजीचा चष्मा is translated by Meera Joshi . The © for this translation lies with Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Based on Original story: 'Grandma’s Glasses', by Rohini Nilekani . © Pratham Books , 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

## Other Credits:

This book has been published on StoryWeaver by Pratham Books. The author of this book, Rohini Nilekani used to earlier write under the pseudonym 'Noni'. The development of the digital version of this book has been supported by HDFC Asset Management Company Limited (A joint venture with Standard Life Investments). Pratham Books is a not-for-profit organization that publishes books in multiple Indian languages to promote reading among children. www.prathambooks.org

## Illustration Attributions:

Cover page: Girl thinking with lady in the foreground, seen through spectacles by Tanaya Vyas © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 2: Girl standing on the cot, Lady standing, by Tanaya Vyas © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: Girl standing on a bed, by Tanaya Vyas © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 4: Girl behind a cot, Lady knitting, by Tanaya Vyas © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 5: Girl crouching behind a bed and watching her grandmother knit, by Tanaya Vyas © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: Girl under a chair, Open Cupboard, by Tanaya Vyas © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 7: Women eating and drinking at the dining table, with girl standing, by Tanaya Vyas © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 8: Women drinking tea and having snacks at the table, by Tanaya Vyas © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 9: Woman and girl holding a sweater, Cat following a girl, lady writing a letter, by Tanaya Vyas © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 10: Letter being written, Old woman and girl holding an orange sweater, by Tanaya Vyas © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.





# आजीचा चष्मा

(Marathi)

आजीचा चष्मा सारखा हरवतो. मग कधीतरी तिला चष्मा शोधण्यासाठी हुशार गुप्तहेराची मदत घ्यावी लागते!

या पुस्तकाची वाचन पातळी २ आहे. ओळखीचे शब्द जाणून वाचणाऱ्या आणि मदत घेऊन नवे शब्द वाचू शकणाऱ्या मुलांसाठी.

